विधानसभा सार्वत्रिक निवडणूक २०१९
**निवडणूक संबंधीत राज्य, जिल्हा व तहसिल स्तरावरील राजपत्रित अधिकाऱ्यांना पारिश्रमिक / मानधन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - सीईएल - २०१९/प्र.क्र.१३९६/१९/३३(१)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०९ डिसेंबर, २०१९

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र राज्यात दिनांक २१ ऑक्टोबर २०१९ रोजी विधानसभा सार्वत्रिक निवडणूका घेण्यात आल्या आहेत. दिनांक २१ सप्टेंबर २०१९ रोजी विधानसभा सार्वत्रिक निवडणूकीची अधिसूचना जारी केल्यापासून ते दिनांक २७ ऑक्टोबर २०१९ ह्या कालावधीत निवडणूकीची प्रक्रिया पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीमध्ये प्रत्यक्ष निवडणूकीच्या कामाशी संबंधित असलेल्या राज्य, जिल्हा व तहसिल स्तरावरील राजपत्रित अधिकाऱ्यांना ह्या निवडणूकीसंबंधातील समय मर्यादेत संवेदनशील, जिकीरीचे दगदगीचे काम अत्यंत परिश्रमपूर्वक व जबाबदारीने पार पाडावे लागले. ह्या निवडणूकीत संबंधित अधिकाऱ्यांवर पडणारा कामाचा ताण, कामाची व्याप्ती व कामाचे दिवस इत्यादी लक्षात घेऊन खाली नमूद केलेल्या राज्य, जिल्हा व तहसिल स्तरावरील, तसेच निवडणूकीच्या कामासंबंधीत राजपत्रित अधिकाऱ्यांना त्यांच्या माहे ऑक्टोबर २०१९ ह्या महिन्यातील अनुज्ञेय मूळ वेतन (Basic Pay) एवढी रक्कम पारिश्रमिक/ मानधन म्हणून देण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. परंतु कोणत्याही अधिकाऱ्यांची अशी रक्कम त्याच्या १ महिन्याच्या वेतनापेक्षा जास्त असणार नाही तसेच सदर मानधन हे एका अधिकाऱ्यास एकदाच देय होईल.

**अ) राज्यस्तर :-**

१. मुख्य सचिव
२. अपर मुख्य सचिव (गृह)
३. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी
४. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग
५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
६. अतिरिक्त मुख्य निवडणूक अधिकारी
७. सह सचिव, मुख्य सचिव यांचे कार्यालय
८. राज्य सूचना विज्ञान अधिकारी, महाराष्ट्र राज्य
९. मुख्य निवडणूक अधिकारी यांच्या कार्यालयातील राजपत्रित अधिकारी
१०. मुख्य निवडणूक अधिकारी यांच्या कार्यालयात प्रत्यक्ष निवडणुकीच्या कामाकरिता ज्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्यात आल्या आहेत असे माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील राजपत्रित अधिकारी
११. मुख्य निवडणूक अधिकारी यांच्या कार्यालयात प्रत्यक्ष निवडणुकीच्या कामाकरिता ज्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्यात आल्या आहेत असे राष्ट्रीय सूचना केंद्रातील (NIC) राजपत्रित अधिकारी
१२. मुख्य निवडणूक अधिकारी यांच्या कार्यालयातील तसेच सामान्य प्रशासन विभागाने अधिग्रहीत करुन ज्यांच्या सेवा उपलब्ध करुन दिल्या आहेत असे कक्ष अधिकारी
१३. निवडणुकीच्या कामासाठी कार्यरत शासन मुद्रण व लेखन सामुग्री संचालनालय, चर्नीरोड, मुंबई व शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नीरोड, मुंबई कार्यालयातील राजपत्रित अधिकारी

**ब) जिल्हास्तरीय:-**

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सहायक आयुक्त/उप आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (फक्त निवडणूकीचे काम करणारे
३. सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी
४. सर्व जिल्ह्यांचे उप जिल्हा निवडणूक अधिकारी
५. सर्व निवडणूक निर्णय अधिकारी (विधानसभा मतदारसंघनिहाय)
६. सर्व विधानसभा मतदारसंघाचे सहायक निवडणूक निर्णय अधिकारी
७. सर्व तहसिलदार (फक्त निवडणूकीचे काम करणारे)
८. नायब तहसिलदार (प्रत्यक्षात निवडणूकीचे कामकाज केलेले)
९. जिल्हा निवडणूक अधिकाऱ्यांचे स्वीय सहायक/चिटणीस/हेडक्लार्क (जे राजपत्रित अधिकारी असतील व जे निवडणूकीचे काम पाहणार आहेत)
१०. या व्यतिरिक्त जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांनी विधानसभा निवडणूक-२०१९ च्या प्रत्यक्ष कामासाठी निवडणूकीच्या संपूर्ण कालावधीकरिता स्वत: लेखी आदेश काढून नियुक्त केलेले इतर राजपत्रित अधिकारी

२. या बाबीवर होणारा खर्च विधानसभा सार्वत्रिक निवडणूक-२०१९ करिता "मागणी क्रमांक ए-२, प्रधानशीर्ष २०१५-निवडणूका, उपशीर्ष १०६-राज्य/संघराज्य क्षेत्र विधानमंडळ निवडणूक घेण्यासाठी लागणारा खर्च, (००)(०१) राज्य/संघराज्य क्षेत्र विधानमंडळ निवडणूक घेण्यासाठी लागणारा खर्च, १३-कार्यालयीन खर्च (२०१५००६८) दत्तमत " खालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल आणि ४५-सातारा लोकसभा मतदारसंघ पोट निवडणूक व विधानसभा सार्वत्रिक निवडणूक या एकाच वेळेच घेण्यात येणाऱ्या निवडणुकीकरिता "मागणी क्रमांक ए-२, प्रधानशीर्ष २०१५-निवडणूका, उपशीर्ष १०४-लोकसभा व राज्य/संघराज्य क्षेत्र विधानसभा यांच्या एकाच वेळेस घेतल्या जाणाऱ्या निवडणुकांचा खर्च, (००)(०१) लोकसभा व राज्य/संघराज्य क्षेत्र विधानसभा यांच्या एकाच वेळेस घेतल्या जाणाऱ्या निवडणुकांचा खर्च, १३-कार्यालयीन खर्च (२०१५००४१) दत्तमत" खालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक : २२७ए/१९/सेवा-६, दिनांक ३१/१०/२०१९, तसेच अनौपचारीक संदर्भ क्रमांक : ३४२/१९/व्यय-४, दिनांक ०५/११/२०१९ त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२०९१२४५४४३००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Shubha Sandeep Borkar
Date: 2019.12.09 16:07:27 +05'30'

**( शुभा बोरकर )**
अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी
महाराष्ट्र राज्य

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र -१ मुंबई

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
६. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव तथा मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११. अतिरिक्त मुख्य निवडणूक अधिकारी, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२. राज्य सूचना विज्ञान अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१३. संचालक, शासन मुद्रण व लेखन सामुग्री संचालनालय, यांचे स्वीय सहायक, चर्नीरोड, मुंबई
१४. सर्व विभागीय आयुक्त
१५. सहायक आयुक्त/ उप आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (निवडणूकीचे काम करणारे)
१६. सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी

    यांना सूचित करण्यात येते की, सदरची रक्कम संक्षिप्त देयकावर काढता येणार नसल्यामुळे त्यांनी कोषागारात तपशिलवार देयक सादर करुन सदर रक्कम खर्ची टाकण्यात यावी.

१७. * सर्व विधानसभा मतदारसंघाचे निवडणूक निर्णय अधिकारी
१८. * सर्व विधानसभा मतदारसंघाचे सहायक निवडणूक निर्णय अधिकारी
१९. * सर्व जिल्ह्याचे उप जिल्हा निवडणूक अधिकारी
२०. सामान्य प्रशासन विभाग/ का.क्र.२६, मंत्रालय, मुंबई
२१. वित्त विभाग सेवा -६, व्यय-४, मंत्रालय, मुंबई
२२. निवड नस्ती (कार्यासन - ३३).